**पुस्तकाचे नांव दुर्ग तिकोना**

प्रकार : दुर्ग दर्शन

लेखक : नाव : भास्कर विजय नारकर

B.E. (Electronics & Telecommunication)

वय : २१ वर्ष

ई-मेल : bnarkar497@gmail.com

ब्लॉग : www.bhaskarnarkar.blogspot.in

bnarkar497@gmail.com

सर्व फ़ोटो: भास्कर नारकर, गणेश देशमुख

ई निर्मिती: सुनिल सामंत

प्रकाशन: ई साहित्य प्रतिष्ठान

आजच्या धकाधकीच्या आणि माहिती तंत्रज्ञानाच्या युगात

मराठी वाचन संस्कृती संवर्धित आणि वृद्धिगत करणाऱ्या

ई-साहित्य प्रतिष्ठानला समर्पित ..

- भास्कर नारकर




किल्ले तिकोना –
भौगोलिक स्थान
तालुका
दुर्ग प्रकार
मावळ, जिल्हा पुणे
गिरिदुर्ग.
भुयारी दरवाजा
बेताळ मंदिर
बेताळ दरवाजा
लेणी
हनुमान शिल्प
श्री तुळजादेवी मंदिर
लेणे व टाके
चुन्याचा घाणा
कठीण वाट
त्र्यंबकेश्वर मंदिर
ध्वजस्तंभ
Map not to scale
दि.२७/२/२०११ रोजी १४ व्या दुर्ग महापुजेनिमित्त स्थापना करण्यात आली
www.shivajitrail.com

# दुर्ग तिकोना

तथाकथित जगाहून वेगळी पण त्याच जगाशी मेळ राखीत आपल्याच विश्वात रमणारी जमात म्हणजे ट्रेकर्स..ही जमात असते फार विलक्षण.. मिळेल ती चटणी भाकरी गोड समजून खाणारी.. सतत गड-किल्ल्याबद्दल माहिती घेणारी.. एकाद्या किल्ल्याचे नाव प्रथम ऐकल्यावर त्याबद्दल "गुगल"काकांना विचारणारी.. किल्ल्याच्या दुरावस्थेबद्दल कळल्यावर हक्काने सरकारला चार शिव्या घाणारी.. वॉटर पार्क आणि रिसॉर्टच्या कृत्रिमतेऐवजी स्वच्छंद निसर्गात रमणारी.. सलग सुट्ट्या आल्यावर कोणत्या गडावर यंदा स्वारी करावी असा विचार करणारी.. या अश्याच भटक्या जमातीतील आम्ही मंडळी.. ट्रेकला जाणार म्हटल्यावर डोक्यात "टिक.. टिक.." वाजलीच म्हणून समजा.. मग ट्रेकचे नियोजन करण्यासाठी, गाड्यांचे वेळापत्रक पाहण्यासाठी खुंटीवर टांगलेला कॅलेंडरची मागील पाने चाळावी लागतात.. कोणती गाडी कोणत्या स्थानकावरून किती वाजता पकडावी या पासून सर्व संशोधन होते.. असाच ट्रेक ठरवला मावळ प्रांतातील "तिकोना"...

२२ जून २०१३ ला, सकाळी लवकर घर सोडून छत्रपती शिवाजी ट्रमिनल गाठले. नियोजनानुसार मुंबई-पुणे इंटरसिटी गाडीने लोणावळा गाठले आणि पुढे लोणावळा-पुणे लोकलने कामशेत गाठले..

कामशेत रेल्वे स्थानकाचे दृश्य विलक्षण होते.. उजवीकडे डोंगर आणि घरे तर डावीकडे इंद्रायणी आमचे स्वागत करत होती.. पावसाळा असल्याने "ती" थोडी मातकट दिसत होती..

कामशेत रेल्वे स्थानकाच्या उजव्या बाजूला असलेल्या रस्त्यावरून चालत आम्ही तिकोनापेठ गावात जाण्याच्या सोयीविषयी विचारपूस केल्यावर दोन मार्ग समोर होते..एक एस.टी. बसचा तर दुसरा खाजगी वाहनाचा.. खाजगी वाहनांना विचारपूस केल्यावर नेहमी सारखाच अनुभव आला वीस कि.मी.च्या प्रवासासाठी पाचशे रुपयाची मागणी झाली..

खरतर पुरातन वास्तूंबद्दल हा अनुभव आपल्या देशात सर्रास येतो.. ह्या वास्तू आपल्या गावाच्या अर्थव्यवस्थेसाठी किती महत्वाच्या आहेत, याचे प्रबोधन होणे आवश्यक आहे.. हेच पर्यटक जर खुश होवून गेले तर ते इतरानाही त्याचे अनुभव सांगतील आणि ते पर्यायाने गावाच्या विकासाठीच पोषक ठरेल.. शेवटी बस साठी वाट पाहत "समोसा पाव" हादडला.. दुकानदाराला विचारपूस केल्यावर बसची वाट पाहण्यापेक्षा पवनानगरला जाणाऱ्या शेअर जीपमधून जाण्याचा सल्ला मिळाला.. या शेअर जीपमध्ये आम्हाला जवळपास कोंबण्यात आले.. आणि थोड्यावेळापूर्वी सामोस्याला पावात कोंबताना कसे वाटले असेल याचा साक्षात्कार झाला. जीपचालकासोबत चार, आमच्या बाजूला चार आणि मागील बाजूस पाच-सहा माणसे कोंबल्यावर कुठे प्रवास सुरु झाला.. आणि श्वास घेण्यासठी जागा ठेवली यासाठी आम्ही देवाचे आभार मानले. घाटातून तिकोना आणि तुंगचे दर्शन झाले. गावागावातून शेवटी आम्ही पवनानगरमध्ये पोहोचलो..(प्रती माणसी-१५ रुपये) तिथून तिकोनापेठेकडे जाणाऱ्या गाडीची विचारपूस केल्यावर आम्हाला एका टेम्पोमध्ये चढवण्यात आले पण हा टेम्पो खास होता.. मागच्या सामान ठेवण्याच्या जागेवर लाकडाच्या फळया मारून बसण्याची सोय केली होती..नशीब या ठिकाणी वाहनचालकाने लोकांना कोंबले नाही.. खडकाळ रस्त्यावरून आमचा प्रवास सुरु झाला..तिकोनापेठेकडे जाताना आपण बरीच उंची गाठतो. पवना धरणाचे दिसणारे दृश्य विहंगम होते..१५ मिनिटात आम्ही तिकोनापेठेत उतरलो (प्रती माणसी-१० रुपये)..समोरच तिकोनाने दर्शन दिले..

# तिकोनाने दर्शन दिले



गावात शिरल्यावर उजवीकडे शाळा, पुढे गेल्यावर डावीकडे मंदिर अश्या काही खुणा सांगता येतील. तिकोनाची उंची सुमारे ३००० फुट असली तरी बरीच उंची आपण तिकोनापेठेत येईपर्यंत गाठतो. पुढे एक मातीचा रस्ता आपल्याला तिकोनाकडे घेवून जातो..



नावाप्रमाणे तिकोनाला तीन कोपरे आहेत..हे तीन सोंड गावातून सहज दिसतात. त्यापैकी डाव्या सोंडेवरून गडाकडे जाणारी वाट आहे.. मातीचा रस्ता आपल्याला एका मोकळया जागेवर घेवून जातो. या ठिकाणचा उपयोग खाजगी वाहनाच्या पार्किंगसाठी होतो. येथे तिकोनाकडे जाणारी वाट व

त्याकडे दिशादर्शीत करणारा फलक दिसतो.. येथेच शिवदुर्ग संवर्धनतर्फे गडावर नॉन-वेज आणि दारू पिणे निषिद्ध असल्याचा फलक निदर्शनास येतो. खरं तर हा फलक ट्रेकरसाठी नाहीच. कारण हाडाचा ट्रेकर असे कृत्य कधीच करणार नाही..




मुळातच तिकोनाची चढण सोप्या श्रेणीत येते.. गडाकडे जाणारी वाट हि तशी सोपी व सहज ओळखता येणारी असल्यामुळे वाटाड्याची गरज भासत नाही.. थोडे उजवीकडे वळून आपण डाव्या सोंडेवरून गडाकडे जातो..

**डाव्या सोंडेवरून गडाकडे जाणारा रस्ता**



पुढे एक भुयारी दरवाजा आणि वेताळ दरवाज्यातून आपण प्रवेश करतो..

थोड्या अंतरावर मारुतीचे शिल्प आहे..जे पनौतीला चपट मारण्याच्या मुद्रेत आहे.. या शिल्पाला "चापट मारुती" असे ही म्हणतात..



मारुतीचे शिल्प



पुढे इतर गडाप्रमाणे बांधकामात उपयोगात येणारा त्याकाळचा चुन्याचा घाणा सुस्थितीत आहे.

चुन्याचा घाणा

थोड्या अंतरावर पुढे डावीकडे छोटे तळे व तळजाई देवीचे मंदिर आहे.



छोटे तळे व तळजाई देवीचे मंदिर

येथे शिवाजी ट्रेलतर्फे गडाचा नकाशा असून गडाचा इतिहास ही उपलब्ध करून दिला आहे.



पुढे डावीकडे गडावर जाण्याच्या पायऱ्या लागतात.. या पायऱ्यांचा चढ जास्त असल्याने चढताना फार दमछाक होते..



गडावर जाण्याच्या पायऱ्या

शत्रूच्या आक्रमणाआधी त्यांचा दम काढण्याची ही युक्ती पाहिली कि त्या काळच्या अभियंत्यांना सलाम करावासा वाटतो. पायऱ्याच्या शेजारीच भुयारी पाण्याचे छोटे टाके आहे..



भुयारी पाण्याचे छोटे टाके

पायऱ्या अरुंद असल्याने एकावेळीस एकाला पुढे जाता येते. उजवीकडे तारा लावल्याने त्यांचा आधार घेता येतो..

थोड्याच वेळाने आपण महादरवाजाजवळ पोहोचतो व पायऱ्या चढल्याचे सार्थक झाल्यासारखे वाटते..



महादरवाजा

महादरवाजाच्या उजवीकडे कातळात टाके कोरलेले आहेत..खरंच त्याकाळी जलसंवर्धनाचे खूप महत्व होते..

महादरवाजातून प्रवेश केल्यावर समोरच आजूबाजूचा प्रदेश निहाळता येतो.. डाव्या सोंडेवरून येणारा मार्ग येथुन स्पष्ट दिसतो..

पुढे थोडे वर चढलो कि त्रंबकेश्वरचे मंदिर होते आणि समोरच भगवा धव्ज डौलाने फडकत होता.



त्रंबकेश्वरचे मंदिर



तिकोनाने धुक्याची चादरच जणू ओढली होती.. त्रंबकेश्वर मंदिराच्या डावीकडे तळे आहे. त्यापुढे एक बुरुज आहे..



तळे



बुरुज

तिकोनावरून तुंगचे रूप मंद पावसात अधिकच मोहक दिसत होते. पवना धरण, लोहगड, विसापूर किल्ले पाहता येतात.



तुंग

थोड्याच वेळात रिमझिम पाऊस सुरु झाला..मागील ट्रेकपासून आमचा आणि पाऊसाचा पाठशिवणीचा खेळ येथे संपला.. गडावर कोठेच डोके लपवण्यासाठी जागा नसल्याने आम्हाला पावसात भिजण्याचा बहाणा मिळाला.. आम्हीही तो मनसोप्त लुटला.. थोड्या वेळाने पाऊस थांबला आणि आम्ही सहभोजनाला सुरुवात केली. घरचे तेच जेवण अशा ठिकाणी.. सुसाट्याच्या वाऱ्यासोबत खालचा प्रदेश निहाळत खाताना खूप रुचकर वाटतो.. थोड्याच वेळात एक कुत्रा आम्हाला सोबत देण्यासाठी आला आम्हीही त्याला चपातीचा तुकडा देवून आपल्यात सामील करून घेतले.. कदाचित "तो" आमच्याकडून टोल घेत होता..

तिकोनाचा माथा हा निमुळता असल्याने १५-२० मिनिटात पाहून होतो. त्रंबकेश्वर मंदिर, दोन बुरुज, एक तळे, धव्जासाठी जागा एवढा प्रदेश.. तेवढ्यात एक माणूस महाविद्यालयीन तरुण-तरुणींना माहिती देत होता. आम्ही ही तेथे गेलो.. तेव्हा कळले हे कोणी गाईड नसून शिवदुर्ग संवर्धनतर्फे नेमलेले रखवालदार आहेत. मंदिराची आणि गडाची देखभाल करणे हे त्यांचे काम.. त्यांनी आमची नावे एका वहीत लिहून ठेवली.. त्याच्या कारणाची विचारपूस केल्यावर समजले कि जास्त पर्यटकाची संख्या असल्यास एस. टी. महामंडळास विनंतीकरून बस फेऱ्या वाढवता येतील.. खरंच किती स्तुत्य उपक्रम आहे.. गर्दी थोडी पांगल्यावर आम्ही कुतूहलापोटी त्यांची विचारपूस केली. व त्यांच्या परवानगीने त्यांचा फोटो ही घेतला.. खरं तर अश्या दुर्गसख्यांची आपल्याला गरज आहे.. आणि शिवदुर्ग संवर्धनचा उपक्रम आपल्या शासनाला चपराक आहे.. पाऊस पुन्हा सुरु झाला आणि आम्हाला तिकोनावरून काढता पाय घ्यावा लागला..

गडाच्या माथ्यावरून पायथ्यापर्यतचा प्रवास आम्ही फक्त अर्ध्या तासात केला. तिकोनापेठेवरून कामशेत रेल्वे स्थानक गाठताना तुंग आमच्याकडे पाहत होता.. जणू आम्हाला विचारत असेल कि काय कधी येणार मला भेटायला?



तुंग

# तिकोनाच्या इतिहास:



दुर्ग तिकोना "वितंडगड" या नावाने देखील ओळखले जातो. निजामशाहीतील मलिक अहमद निजामशाहने तिकोना १५८५ मध्ये जिंकून घेतला. १६५७ मधील कोकण मोहिमेदरम्यान छत्रपती शिवाजी महाराजांनी तिकोना किल्ला, कर्नाळा, लोहगड, माहुली, सोनगड आणि विसापूर किल्ल्यांसोबत निजामशाहीकडून स्वराज्यात आणला. मावळ प्रांताच्या मध्यभागी असल्याने हा किल्ला पवना-मावळ प्रांतावर देखरेख करण्याच्या दृष्टीने महत्त्वाचा होता. १६६५ मध्ये जयसिंघाच्या स्वारीच्यावेळी दिलेरखानाने तिकोनाच्या आजूबाजूची गावे जिंकून घेतली. पण तिकोना अजिंक्य राहिला. १२ जून १६६५ मधील पुरंदरच्या तहात तिकोना मुगलांकडे गेला. १८ जूनला तिकोनाचा ताबा मुगल सरदार कुबदखानने घेतला पण नंतर मराठ्याने तिकोना पुन्हा जिंकून घेतला.

१६८२ मध्ये छत्रपती संभाजी महाराज आणि औरंगजेबचा मुलगा अकबरची भेट झाली. या भेटीनंतर संभाजी महाराजांनी अकबरला तिकोना वास्तव्यास दिले पण तिकोनावरील वातावरण न मानवल्याने नंतर त्याला जैतापूरला पाठवण्यात आले.१८१८ मध्ये ब्रिटिशासोबत येथे एक छोटी लढाई झाली त्यात तिकोनाचे फार नुकसान झाले, ते आजतागायत कायम आहे

सौजन्य : ( http://en.wikipedia.org/wiki/Tikona )

सौजन्य : (http://trekshitiz.com/Ei/Tikona-Trek-Pune-District.html )

# गडावर जाणारे मार्ग:

मुंबईतील मंडळीनी कामशेत रेल्वे स्थानक गाठावे. लोणावळा-पुणे लोकलने आल्यास लोणावळ्यापासून दुसरे स्थानक. कामशेतवरून एस. टी. ने अथवा जीपने काळे कॉलनी गाठून तेथून तिकोनापेठेकडे जाणारी जीप किंवा टेम्पो तिकोनापेठ गावाजवळ सोडतो. तिकोनासाठी तिकोनापेठ गावातून जाणारी सोपी वाट आहे. कामशेतवरून पौडमार्गे पुण्याला जाणाऱ्या एस. टी. ने थेट तिकोनापेठ गाठता येते.

पुण्यावरून येणाऱ्या मंडळीसाठी पौड मार्गे कामशेतला येणारी एस. टी. सोयीची ठरते.

# जवळील प्रेक्षणीय ठिकाणे:

**बेडसे लेण्या:**





कार्ले आणि भाजे लेण्या जवळच पण कार्ले आणि भाजे लेण्या इतक्या परिचित नसलेल्या या बेडसे अथवा बेडसा लेण्या कामशेत जवळच आहेत. या काहीशी अपरिचित लेण्या पर्यटकांना एक सुखद अनुभव देतात. कार्ले-भाजे-बेडसे हे लेण्याचे त्रिकुट बेडसे लेण्याऐवजी अपूर्ण आहे. सुमारे ४०० पायऱ्या चढून या नितांत सुंदर लेण्या पहिल्यावर समाधानी झाल्यासारखे वाटते. बेडसे येथे मुख्य दोन लेण्या आहेत. एका लेणीत चैत्यगृह आणि आणि दुसऱ्या लेणीत विहार आहे. पूर्वाभिमुख असलेल्या या लेण्यांना पहाटे सूर्य प्रकाशात पाहणे एक सुंदर अनुभव असतो. बेडसे लेण्याचे सौंदर्य पावसाळयात खुलून दिसते. हिरव्या शाळूतील नव वधूच जणू..पावसाळयात लहान मोठे धबधबे बच्चे कंपनीसाठी धमाल अनुभव असतो. खाजगी वाहने असल्यावर एक दिवसात सहज तिकोना आणि बेडसे लेण्या अशी मस्त सहल होऊ शकते.

**किल्ले तुंग:**

तिकोनावरून पवना जलाशयाच्या दुसऱ्या बाजूस खुणावणारा तुंग सर्वांना मोहिनी घालतो. अनेक ट्रेकर तिकोना आणि तुंग असा जोड ट्रेक ही करतात. तिकोनापेठेवरून कामशेत-मोरवे बस ने तुंगवाडी गाठून तेथून तुंग ट्रेक करता येतो.

**किल्ले लोहगड:**

लोहगड, विसापूर, तिकोना आणि तुंग या दुर्ग मालिकेतील लोहगड हा सर्वात परिचित आणि वर्ष भर मुंबई आणि पुण्यातील मंडळीची वर्दळ असलेला हा किल्ला. मळवली रेल्वे स्थानकाच्या बाहेरून भाजे गावाकडे जाणारा रस्ता लोहगड आणि विसापूर किल्ल्यावर घेवून जातो. सोपी वाट आणि लोकांची वर्दळ यामुळे वाट चुकण्याची शक्यता फार कमी असते. विंचू कट्टा आणि लोहगडवरील भक्कम बांधकाम हे पाहण्यासारखे आहे.

**किल्ले विसापूर:**

लोह्गाडचा जोड किल्ला आणि आकाराने लोहगडपेक्षा प्रचंड असलेला विसापूर हा दुर्लक्षित राहिला आहे. गायमुख खिडीपर्यंतर नंतर लोहगडला जाणारी लोकाची पावले क्वचितच विसापूरकडे फिरकतात. गायमुख खिंडीपासून डावीकडील वाट विसापूर कडे तर सरळ जाणारी उजवी कडील वाट लोहगडकडे जाते. २ दिवसाचे नियोजन करून मस्त लोहगड, विसापूर, तुंग आणि तिकोना असा ट्रेक होवू शकेल.

# ट्रेकचे कसे नियोजन कराल?

- ट्रेकसाठीची जागा ठरवल्यास त्या जागेबद्दल जास्तीत जास्त माहिती घ्या. पाण्याची सोय, खाण्याची सोय, रात्री राहावयास मुक्कामाची सोय या बद्दल माहिती घ्या.

- ट्रेकसाठीच्या जागेवरील धोके लक्षात घ्या. जंगलातील जागा असल्यास त्या भागातील आढळणारे जंगली प्राण्याची माहिती घेवून ठेवा. अनपेक्षित हल्ल्यापेक्षा सावध असलेले बरे.

- ट्रेकच्या जागेवर जाण्यासाठीच्या वाहतुकीच्या पर्यायाचा विचार करा आणि त्या संबधी माहिती घ्या. उदा. जर एखाद्या गावाकडे जाणारी बस सुटली तर पर्यायी वाहतूक सोयीची माहिती वेळ आणि पैश्याची बचतच करेल.

- लोहगड, सिंहगड सारख्या सतत गजबजलेल्या किल्ल्यावर जायचे असल्यास शनिवार, रविवार आणि सुट्टीचे दिवस टाळा.

- उन्हाळयाचे दिवसात आणि एरवीही पाण्याच्या १-२ बाटल्या सोबत बाळगा. सुका खाऊ आपल्या सोबत ठेवा.

- रेल्वेने जाणार असाल तर सर्व रेल्वेचे वेळापत्रक एका कागदावर लिहून ठेवा. स्मार्ट फोन किती ही स्मार्ट असले तरी एकदा चार्जिंग उतरली कि त्या डब्याचा काही उपयोग नाही.

- किल्ल्याचा नकाशा उपलब्ध असेल तर ते एका कागदावर काढून घ्या अथवा नकाश्याची प्रिंट काढून घ्या. मोबाईल बाबाच्या भरोश्यावर राहू नका.

- किमती वस्तू आणि सोन्याचे दागिने आपल्या सोबत नेणे टाळा. काही ट्रेकरसोबत लुटीच्या घटना सुद्धा झाल्या असल्यामुळे योग्य ती काळजी घ्या.

- वाट माहित नसल्यास वाटाड्या घेतलेला बरा. ट्रेकच्या मार्गात लोकांना योग्य मार्गाबद्दल सतत विचारलेले बरे.

- शेवटची बस आणि शेवटची रेल्वेबद्दल माहिती घ्या म्हणजे ट्रेक कधी आटोपता घ्यायचा याचा एक आराखडा बांधता येईल.

- ट्रेकरचे ब्लॉग वाचा त्या ट्रेकमध्ये आलेल्या अडथळे आणि घ्यावयाची काळजी याबद्दल माहिती मिळेल.

# ई साहित्य प्रतिष्ठान

दक्षिण भारत हा भव्य मंदिरांसाठी प्रसिद्ध आहे. एका एका मंदिराची उंची, भव्यता आणि श्रीमंती पहात आणि ऐकत रहावी. म्हणून तर पर्यटक दक्षिणेची मंदिरं पहायला जातात. दक्षिणात्य लोकांना या मंदिरांचा फ़ार अभिमान आहे. काहीसा गर्वही. असायलाच हवा.

पण ती मंदिरं उत्तरेतहून आलेल्या आक्रमक वाटळीपासून सुरक्षित राहिली याचं श्रेय मात्र मराठी लोकांनी अभिमानाने घ्यायला हवं. मुघलशाही, कुतुबशाही , आदिलशाही अशा बड्या बड्या शाह्यांशी एक हाती मुकाबला करून आम्ही मराठ्यांनी तंजावर ते पेशावर मराठेशाही स्थापन केली. आमच्या या किल्ल्यांनी आमच्या पूर्वजांनी एक संरक्षक भिंत उभी केली म्हणून दक्षिण सुरक्षित राहिली. सर्वच मराठी जण लढाईला गेले असतील असे नाही. पण काहींनी रसद पोचवली असेल. आणि काहींनी घाम गाळून दणकट किल्ले बांधले असतील. थोडे थोडके नाही तिनशेहून अधिक कडक किल्ले. शोभेचे नाही. रणकंदनी किल्ले. आमनेसामनेच्या युद्धात जिंकणं अशक्य असे किल्ले. प्रत्येक किल्ल्याची गुंतागुंतीची रचना. प्रत्येक किल्ल्याची वेगवेगळी शक्तीस्थानं. प्रत्येक किल्ला एक ऊर्जास्थान. एक शक्तीस्थळ. मुडद्यासारख्या मनालाही उभारी देईल असं. या किल्ल्यांचा आम्हाला गर्व आहे. हे किल्ले हे आमच्या तरुणांसाठी मंदिरंच आहेत. भवानीची शक्ती मंदिरं.

ई साहित्य प्रतिष्ठानने या प्रत्येक शक्तीस्थळाचं स्वतंत्र ई पुस्तक बनवण्याचं काम हाती घेतलं. म्हणता म्हणता हजार हात पुढे सरसावले. नचिकेत जोशी, माधुरी नाईक, अरविंद नाईक, पंकज घारे, ओंकार ओक अशा तरूण लेखकांच्या फ़ळीत आता भास्कर नारकर, संकल्प चौधरी असे ताज्या दमाचे शिलेदार सामिल होत आहेत. या पुस्तिकांतून नव्या ट्रेकर्सना

मार्गदर्शन तर होतेच पण विदेशात असलेल्या किंवा वयानुरूप ट्रेकिंगपासून दूर असलेल्यांना पुनःप्रत्ययाचा आनंद मिळतो. त्यामुळे या पुस्तिका फ़ार आनंदाने वाचल्या जातात.

या पुस्तिका प्रत्येक मराठी माणसापर्यंत पोहोचल्याच पाहिजेत. आम्ही त्यासाठी लाखों लोकांना या मेलने पाठवतो. पण कोट्यवधी मराठी लोकांपर्यंत त्या न्यायच्या तर त्यासाठिही हजार हात हवेत. तुमच्या ओळखीच्या तरूण मंडळींना या अभियानात सामिल करून घ्या. त्यांचे ई मेल पत्ते कळवा. त्यांना पुस्तके द्या. आता ही पुस्तके मोबाईलवरही वाचता येतात. www.esahity.com वरून डाऊन लोड करा. शिवाय नवनवीन apps येत आहेत. ई साहित्य प्रतिष्ठानचं app लवकरच येत आहे.

मराठी ही केवळ भाषा नाही. ती एक वृत्ती आहे. एक परंपरा. एक वारसा. त्याचं जतन करूया. सर्व राजकारणापासून दूर राहून. पुढच्या पिढ्यांना या समृद्ध वारशाचा लाभ घेऊ द्या. त्यासाठी पैसे नकोत. फ़ार वेळही नका देऊ.

कृपया आपल्या ओळखीच्या दहा मंडळींचे ई मेल पत्ते कळवा. आमचे विशेष सभासद होण्यासाठी एवढंच पुरेसं आहे.

टीम ई साहित्य

esahity@gmail.com

ई साहित्य प्रतिष्ठान